**अस्थायी शासकीय कर्माऱ्यांना / अधिकाऱ्यांना**
**स्थायित्व प्रमाणपत्र उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः- एमएफएस २०१८/प्र.क्र.८९/फ-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक- ८ ऑगस्ट २०१८.

<u>वाचा</u> : - शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग क्र.१४१४/(प्र.क्र.७३/१४) १३ - अ
दि.११/९/२०१४.

<u>**आदेश**</u> **:-**

शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग दिनांक ११ सप्टेंबर, २०१४ अन्वये अस्थायी शासकीय कर्मचा-यांना / अधिकाऱ्यांना स्थायित्व प्रमाणपत्र उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने सूचना निर्गमित केल्या असून त्यानुसार प्रथम नियुक्तीच्या पदावर ३ वर्षाची नियमित सेवा पूर्ण करणाऱ्या व खालील नमूद केलेल्या शर्तीची पूर्तता करित असलेल्या अस्थायी शासकीय कर्मचा-यांपैकी गट - अ व गट- ब (राजपत्रित ) अधिकाऱ्यांच्या बाबतीत संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्या तसेच तसेच गट - ब (अराजपत्रित , गट- क व गट- ड कर्मचाऱ्यांच्या बाबतीत संबंधित कार्यालय प्रमुखानी स्थायित्व प्रमाणपत्र देणे आवश्यक आहे.

१) कर्मचाऱ्यांची / अधिकाऱ्यांची नियुक्ती सेवाप्रवेश नियमानुसार व विहित पध्दतीने होणे.
२) कर्मचारी / अधिकारी सेवेस प्रात्र असल्याबाबतचे वैद्यकिय प्रमाणपत्र असणे व कर्मचाऱ्यांने /अधिकाऱ्यांनी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा उत्तीर्ण होणे.
३) कर्मचाऱ्याचा / अधिकाऱ्याचा सेवाभिलेख (उदा. गोपनीय अहवाल, उपस्थिती, सचोटी इत्यादी चांगला असणे.

२. शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग दि.११/९/२०१४ मधील वरील परि.१ मध्ये नमुद करण्यात आलेल्या सर्व शर्ती खालील विवरणपत्रामध्ये नमुद करण्यात आलेल्या अस्थायी शासकीय अधिकाऱ्यांच्या बाबतीत पुर्ण झालेल्या आहेत आणि त्यानुसार ते अधिकारी आवश्यक प्रयोजनार्थ त्यांच्या नावासमोर स्तंभ ३ नमुद केलेल्या पदावर स्तंभ - ४ मध्ये केलेल्या दिनांकापासून स्थायी करण्यास शासनाची मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | नांव | ज्या पदावर स्थायित्व प्रमाणपत्र देण्यात येत आहे त्या पदाचे नाव | स्थायिकरणाचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.महादेव नामदेव मोहीते | सहाय्यक वनसंरक्षक गट -अ (कनिष्ठ श्रेणी) | ३१ जुलै २०१८ |
| २ | श्री.लक्ष्मण मानक पाटील | सहाय्यक वनसंरक्षक गट -अ (कनिष्ठ श्रेणी) | ३१ जुलै २०१८ |
| ३ | कु. स्नेहलता दिलीपराव पाटील | सहाय्यक वनसंरक्षक गट -अ (कनिष्ठ श्रेणी) | ३१ जुलै २०१८ |
| ४ | श्रीमती गिता सदाशीव नन्नावरे | सहाय्यक वनसंरक्षक गट -अ (कनिष्ठ श्रेणी) | ३१ जुलै २०१८ |
| ५ | श्री.स्वप्नील तुकाराम घुरे | सहाय्यक वनसंरक्षक गट -अ (कनिष्ठ श्रेणी) | ३१ जुलै २०१८ |
| ६ | कु. कल्पना बबन टेमगिरे | सहाय्यक वनसंरक्षक गट -अ (कनिष्ठ श्रेणी) | ३१ जुलै २०१८ |
| ७ | कु. कांचन ज्ञानोबा पवार | सहाय्यक वनसंरक्षक गट - अ (कनिष्ठ श्रेणी) | ३१ जुलै २०१८ |
| ८ | श्री.बाळकिशोर अर्जुन पोळ | सहाय्यक वनसंरक्षक गट -अ (कनिष्ठ श्रेणी) | ३१ जुलै २०१८ |

**४.** प्रस्तुत स्थायिकरण हे शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. एमएफएस-१५०१/२५६० /प्र.क्र.१८२ /फ-८, दि.२३/०८/२०१२ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या दिनांक १/१/१९९७ ते ३१/१२/१९९८ या कालावधीच्या सहाय्यक वनसंरक्षकांच्या अंतिम सामायिक ज्येष्ठतासूचीनुसार करण्यात आले आहे. सदर ज्येष्ठतासूची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन ठेवून तयार करण्यात आल्यामुळे प्रस्तुत स्थायीकरणही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या अंतिम मान्यतेच्या अधीन राहील. तसेच महाराष्ट्र प्रशासकिय न्यायाधिकरणात अथवा सर्वोच्च न्यायालयात ज्येष्ठतेबरोबर प्रलंबित असलेल्या मुळ अर्ज, दिवाणी अर्ज / अपिल/ इ. याचिकेतील निर्णयामुळे ज्येष्ठतासूचीत बदल झाल्यास त्याच्याही वरील स्थायीकरण अधीन राहील. पुढे असेही स्पष्ट करण्यात येत आहे की, वरील कारणामुळे सहाय्यक वनसंरक्षकांच्या ज्येष्ठतासूचीत बदल करावा लागल्यास व त्या अनुषंगाने स्थायीकरणाच्या दिनांकात बदल तसेच अस्थायीकरण करावे लागल्यास त्याबाबत सुधारणा करण्याचे सर्व अधिकार शासनाकडे राहतील.

५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर यांनी सर्व संबंधितांना कळवून उपरोक्त अधिकाऱ्यांच्या सेवापुस्तकात योग्य ती नोंद घेण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०८१२१३२९५११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.08.08 12:18:14 +05'30'

**(अतुल कोदे)**
सह सचिव (वने)
महसूल व वनविभाग

**प्रति :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यक संवर्ग), नागपूर
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) १/२ महाराष्ट्र मुंबई/नागपूर
८. सामान्य प्रशासन विभाग (का-१२), मंत्रालय, मुंबई.
९. संबंधित अधिकारी (प्रधान मुख्य वनसंरक्षक, म.रा. नागपूर यांचे मार्फत)
१०.अ.स. /फ-७, कार्यासन महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवड नस्ती (फ-८ कार्यासन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.